एकात्मिक राज्य जल आराखडा तयार करण्यासाठी कृतीगटास मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्र. मजनिप्रा- २०१७/२०३/प्र.क्र.४१-भाग-१/२०१७/जसं(आस्था)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २७/१२/२०१८

वाचा:- शासन निर्णय क्र.मजनिप्रा-२०१७/२०३/(प्र.क्र. ४१-भाग-१/२०१७/जसं(आस्था), दि.२७/१२/२०१७, दि. १२/०४/२०१८, दि. ०४/०६/२०१८ व दि.०१/०८/२०१८.

प्रस्तावना :-

मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली राज्य जल परिषदेच्या दि.२२/६/२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत कृष्णा खोरे, तापी खोरे, नर्मदा खोरे, पश्चिम वाहिनी नदी खोरे व महानदी खोरे एकात्मिक जल आराखडयास मान्यता मिळाली आहे. सदर बैठकीत “सर्व खोरे निहाय एकात्मिक राज्य जल आराखड्याचे एकत्रिकरण व एकात्मीकीकरण करुन सर्व खो-यांचा एकात्मिक राज्य जल आराखडा कृतीगटामार्फत १५ जुलै, २०१८ पर्यंत पूर्ण करुन राज्य जलमंडळ व राज्य जल परिषद यांच्या मान्यतेसह ३१ जुलै, २०१८ पर्यन्त अंतिम करावे" असे निदेश आहेत.

तसेच मा.उच्च न्यायालयात जनहित याचिका क्र. १७३/२०१३ बाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२३/०९/२०१६ रोजी दिलेल्या एका महत्वपूर्ण निर्णयाद्वारे एकात्मिक राज्य जल आराखडा दिलेल्या विहित मुदतीत करणे बाबत आदेश आहेत.

मा. उच्च न्यायालय व राज्य जलपरिषदेच्या सुचनेनुसार कृष्णा खोरे, तापी खोरे, नर्मदा खोरे व पश्चिम वाहिनी नदी खोऱ्याचे एकात्मिक जल आराखडे पूर्ण राज्याच्या सर्व नदी खोऱ्याचा एकात्मिक जल आराखडा विहित मुदतीत पूर्ण होण्यासाठी समांतररित्या कार्यवाही करण्यासाठी शासन निर्णय दि.२७/१२/२०१७ अन्वये कृतीगटाची स्थापन करण्यात आली. कृतीगटाचा कार्यकाळ दि.१५ मार्च, २०१८ असा होता.

मा.मुख्य सचिव महोदयाच्या अध्यक्षतेखाली दि.१७/११/२०१८ रोजी संपन्न झालेल्या राज्य जल मंडळाच्या (पंधराव्या) बैठकीत प्रारुप एकात्मिक राज्य जल आराखडयास सुधारणांसह मान्यता देण्यात आली. सदर बैठकीत देण्यात आलेल्या निदेशांचे अनुपालन करुन त्यानुसार राज्य जल परिषदेच्या बैठकीत प्रारुप एकात्मिक राज्य जल आराखडा अंतिम मान्यतेसाठी सादर करणे, राज्य जल परिषदेने काही सुधारणा निदेशित केले असल्यास त्याप्रमाणे सुधारणा करुन आराखडा शासनाच्या संकेत स्थळावर सादर करण्याची कार्यवाही पुर्ण होईपर्यंतच्या कालावधीसाठी कृतिगटास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने आता खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.-

**शासन निर्णय :-**

राज्यातील सर्व खोऱ्याचा एकात्मिक राज्य जल आराखडा तयार करण्याच्या दृष्टीने स्थापन करण्यात आलेल्या कृतीगटास मा.मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.१७/११/२०१८ रोजी संपन्न झालेल्या राज्य जल मंडळाच्या (पंधराव्या) बैठकीत देण्यात आलेल्या निदेशांचे अनुपालन करुन त्यानुसार राज्य जल परिषदेच्या बैठकीत प्रारुप एकात्मिक राज्य जल आराखडा अंतिम मान्यतेसाठी सादर करणे ,राज्य जल परिषदेने काही सुधारणा निदेशित केल्या असल्यास त्याप्रमाणे सुधारणा करुन एकात्मिक राज्य जल आराखडा शासनाच्या संकेत स्थळावर सादर करण्याची कार्यवाही पुर्ण होईपर्यंतच्या कालावधीसाठी कृतिगटास मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८१२२७१७०४५२५३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Rajnish Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2018.12.27 17:10:07 +05'30'

**( र. रा. शुक्ला )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्ष नेते, विधान सभा व विधान परिषद,
७. मा.प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, विधान सभा व विधान परिषद
८. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई
१२.सचिव, (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१३.सचिव, जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१४.सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
१५. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक
१६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१७. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१८. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
१९. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
२०. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
२१. मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
२२. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगांव
२३. मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई
२४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
२५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर
२६. मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, पुणे
२७.सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२८.सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२९.सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३०.जसं (आस्था) कार्यासन, संग्रहार्थ.